**उपसंचालक, क्रीडा व युवक सेवा**
**या पदावर पदोन्नतीने पदस्थापना देण्याबाबत.**
**श्री. नवनाथ फ़रताडे, जिल्हा क्रीडा अधिकारी**

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांक:-संक्रीआ-१०२०/प्र.क्र.७७/क्रीयुसे-२**
मादाम कामा मार्ग,हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय,मुंबई ४०० ०३२
दिनांक- ०८ सप्टेंबर, २०२१

**शासन निर्णय :-**

क्रीडा व युवक सेवा संचालनालयाच्या आस्थापनेवरील जिल्हा क्रीडा अधिकारी/ सहायक संचालक (वेतनस्तर एस-२०, रु.५६१००-१७७५००) या पदावर कार्यरत असणाऱ्या खालील नमूद अधिकाऱ्यास, शासनाने मान्य केलेल्या सन २०२०-२१ च्या निवडसूचीनुसार उपसंचालक, क्रीडा व युवक सेवा (वेतनस्तर एस-२३, रु. ६७७००-२०८७००) या पदावर जेष्ठतेनुसार व गुणवत्तेनुसार खालील अटींच्या अधीन राहून पदोन्नती देण्याचा निर्णय शासनाने घेतला आहे.

| अ.क्र. | अधिकाऱ्याचे नाव व सध्याची पदस्थापना | मूळ जातीचा प्रवर्ग | पदोन्नतीनंतरची पदस्थापना |
|---|---|---|---|
| १ | श्री. नवनाथ भानुदास फ़रताडे, जिल्हा क्रीडा अधिकारी, मुंबई शहर | खुला | उपसंचालक (मुख्यालय), क्रीडा व युवक सेवा, पुणे |

२. सदर पदोन्नतीनुसार संबंधित अधिकाऱ्यांना देण्यात आलेली पदस्थापना सामान्य प्रशासन विभाग, अधिसूचना दि.२८.०४.२०१५,दि.१६.०७.२०१५ व दि.१५.०६.२०१७ मधील विभागीय संवर्ग वाटपाच्या तरतुदीनुसार व सक्षम प्राधिकाऱ्याच्या मान्यतेने करण्यात येत आहे.

३. सदर पदोन्नत्या निव्वळ तात्पुरत्या स्वरुपात मा.सर्वोच्च न्यायालयाच्या विशेष अनुमती याचिका क्र.२८३०६/२०१७ वरील अंतिम निर्णयाच्या अधीन राहून तसेच सदर शासन निर्णयाच्या दिनांकास मा.न्यायालयात प्रलंबित असलेल्या पदोन्नती विषयक प्रकरणांवरील निर्णयाच्या निकालाच्या अधीन राहून देण्यात येत आहेत.

४. आयुक्त, क्रीडा व युवक सेवा,पुणे यांनी संबंधित अधिकाऱ्यांस पदोन्नतीच्या ठिकाणी रुजू होण्याकरिता तात्काळ कार्यमुक्त करण्याची कार्यवाही करावी. तसेच संबंधित अधिकारी यांनी पदोन्नती आदेश निर्गमित झाल्याच्या दिनांकापासून ३० दिवसाच्या आत पदोन्नतीच्या पदावर रुजू व्हावे व संबंधित अधिकारी रुजू झाल्याचा दिनांक आयुक्त,क्रीडा व युवक सेवा यांनी शासनास कळवावा.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२१०९०८११५१०५४३२१ असा आहे. हा शासन निर्णय डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Swati Madhukar Nanal

Digitally signed by Swati Madhukar Nanal
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=82e1d6f07c5cabf5884958ee70015d36b35b2c07e9700fe62cba2439a81b4be4, serialNumber=007d84f8ce44beba86b0ca2d0155d67cc1a9db4f8d59bc9d8067628d62bcdc1a, cn=Swati Madhukar Nanal
Date: 2021.09.08 11:55:05 +05'30'

**( स्वाती नानल )**
**उप सचिव,महाराष्ट्र शासन**

**प्रत:-**

१. आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे.-
श्री. नवनाथ फ़रताडे यांच्या पदोन्नतीने रिक्त होणाऱ्या जिल्हा क्रीडा अधिकारी, मुंबई शहर या पदाचा अतिरीक्त कार्यभार श्री. अभय चव्हाण, तालुका क्रीडा अधिकारी, मुंबई शहर यांच्याकडे तात्पुरत्या स्वरुपात सोपवावा.
२. सर्व विभागीय उपसंचालक, क्रीडा व युवक सेवा (संचालनालयामार्फत).
३. सर्व जिल्हा क्रीडा अधिकारी (संचालनालयामार्फत)
४. संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी
५. संबंधित अधिकारी (संचालनालयामार्फत)

**प्रत माहितीसाठी:-**

१.मा.मंत्री,क्रीडा व युवक कल्याण यांचे विशेष कार्य अधिकारी
२. मा. राज्यमंत्री, क्रीडा व युवक कल्याण यांचे विशेष कार्य अधिकारी
३. सचिव (सा.वि.स),सामान्य प्रशासन विभाग (कार्यासन १६ ब)
४. संबंधित कार्यासन अधिकारी (क्रीयुसे-१/३)
५. निवड नस्ती (क्रीयुसे-२)